**अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई व संचालक, मुंबई विकास विभाग चाळी यांच्या अधिपत्याखालील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीओएन २०२०/प्र.क्र.५२/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दि. १५ सप्टेंबर, २०२०**

**संदर्भ** :१) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. सीओएन-२०२०/प्र.क्र.२८/प्रशासन-१ दि. २७ मार्च, २०२०
२) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई यांचे दि. १० ऑगस्ट, २०२० रोजीचे पत्र.
३) संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई यांचे दि.२७ ऑगस्ट २०२० रोजीचे पत्र.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि. ३१ ऑगस्ट, २०२०
५) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दि. ०२ सप्टेंबर, २०२० रोजीचे पत्र.

**शासन निर्णय -:**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई (२)मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई व (३) संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई यांच्याकडील अस्थायी पदे दि. ०१ मार्च, २०२० ते ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत चालू ठेवण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई (२)मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई व (३) संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील पुढील विवरणपत्रात दर्शविल्यानुसार नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत, या अटीच्या अधीन राहून दिनांक **०१ सप्टेंबर, २०२०** पासून दिनांक **२८ फेब्रुवारी, २०२१** पर्यंत चालू ठेवण्यास शासन मंजुरी देत आहे.

| **कार्यालयाचे नाव** | **नियमित अस्थायी आस्थापनेवरील पदे** |
|---|---|
| अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई | ०८ |
| मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई | १८ |
| संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई | ०७ |

३. या बाबीवरील खर्च अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई व मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयांसाठी मंडळ कार्यालयातील पदांसाठी २०५९ - सार्वजनिक बांधकामे ८० - सर्वसाधारण, ००१ - संचालन व प्रशासन (चार) पर्यवेक्षण (योजनेतर) व विभाग / उपविभागांतर्गत पदांसाठी २०५९ - सार्वजनिक बांधकामे, ८० - सर्वसाधारण - ००१ - संचालन व प्रशासन (पाच) कार्यान्वयन (योजनेतर) या लेखाशिर्षाखालील चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

तसेच संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई या कार्यालयासाठीचा खर्च हा २२१७-नगर विकास, २२१७०२३४-००१-१ संचालक, बी.डी.डी. चाळी, ०१ वेतन या लेखाशिर्षाखालील चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.: पदनि २०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क. दि. ३१ ऑगस्ट, २०२० या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थाळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००९१५१६४१५२९७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nisha Manohar Mahajan

Digitally signed by Nisha Manohar Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a9f1749dec86c69520dc99c8a73d64e830153ee031b1b93c743e21a94cd3e93, cn=Nisha Manohar Mahajan
Date: 2020.09.15 16:43:34 +05'30'

**(नि.म.महाजन)**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत**-१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३.महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५.वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय, मुंबई.
६.वित्त विभाग (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
७. अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई
८. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई
१०.संबंधित कोषागार / उप कोषागार अधिकारी
११.कार्यासन अधिकारी, सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यासन अधिकारी, प्रशासन१-, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. (**निवडनस्ती)**